अवैद्य दारुधंद्यावा बंदी आणण्यासाठी तालुका स्तरीय समितीची स्थापना..

---

## महाराष्ट्र शासन

गृह विभाग

शासन निर्णय क्रमांक: सीएलसी-११०१/सीआर-१/भाग-२/इएक्ससी-२.
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२. दिनांक: ०६ डिसेंबर, २००२.

**प्रस्तावना:** अवैद्य दारुनिर्मिती व विक्रीवर पायबंद घालणेसाठी विविध परिपत्रके शासन स्तरावरुन निर्गमित करण्यात आलेली आहेत. तथापि, शासनाच्या असे निदर्शनास आले आहे की, वरील परिपत्रकातील सूचनांची अंमलबजावणी ही काटेकोरपणे केली जात नाही. यास्तव, शासनाने अवैद्य दारुधंद्यांच्या अनुषंगाने काढलेल्या आदेशाचे योग्य पालन होते की नाही हे पहाण्यासाठी तालुकास्तरावर खालीलप्रमाणे समिती स्थापन करण्याचा निर्णय घेतला आहे.

निर्णय:- प्रस्तावनेत नमुद केल्याप्रमाणे राज्यातील प्रत्येक तालुक्यात संबंधित तालुक्याचे तहसिलदार यांच्या अध्यक्षतेखाली तालुकास्तरीय समिती गठीत करण्यात यावी. ह्या समितीत ५०% सदस्य हे महिला सदस्य असावेत. समितीची रचना पुढीलप्रमाणे राहील.

| | |
|---|---|
| १) तहसिलदार - | अध्यक्ष |
| २) भ्रष्टाचार विरोधी जन आंदोलन (महाराष्ट्र) यांचा एक प्रतिनिधी - | सदस्य |
| ३) स्वातंत्र्य सैनिक (असल्यास) एक - | सदस्य |
| ४) तालुक्यातील स्वयंसेवी संस्थांचा एक प्रतिनिधी- | सदस्य |
| ५) शासन मान्य महाविद्यालयाचे प्राचार्य- | सदस्य |
| ६) पत्रकार, वकिल, सामाजिक कार्यकर्ता, समाजातील प्रतिष्ठीत नागरीक (प्रत्येकी एक)- | सदस्य |
| ७) तालुक्याच्या पोलीस ठाण्याचे अंमलदार/ठाणेदार. | सदस्य |
| ८) राज्य उत्पादन शुल्क उपविभागाचा निरीक्षक- | सदस्य सचिव |

२. या समितीवरील अशासकीय सदस्यांची नियुक्ती जिल्हाधिकारी यांनी संबंधीत जिल्हयाचे पालकमंत्री यांच्याशी विचार विनिमय करुन करावी. समितीचा कार्यकाल तीन वर्षाचा राहील. मात्र नविन समिती अस्तित्वात येईपावेतो जुनी समिती कार्यरत राहील.

३. समितीचे कार्यक्षेत्र फक्त तालुक्या पुरते मर्यादित राहील व समितीचे काम शासनाने अवैध दारुबंदीच्या अनुषंगाने काढलेल्या आदेशाचे योग्य पालन होते की नाही हे पाहणे असेल.

४. समितीने महिन्यातून एकदा बैठक घ्यावी व गावातील हातभट्टीच्या दारुबंदीची मागणी असूनही पोलीस खाते कार्यवाही करीत नसल्यास समिती त्यावर विचार विनिमय

करुन त्याबाबतचा अहवाल जिल्हाधिकारी यांच्यामार्फत क्षेत्रीय पोलीस महानिरीक्षक/पोलीस आयुक्त यांना पाठविल. सदर अहवालाची शहानिशा करुन क्षेत्रीय पोलीस महानिरीक्षक/पोलीस आयुक्त संबंधित पोलीस अधिकारी/कर्मचारी यांच्यावर योग्य ती कार्यवाही करतील.

५. समितीवरील अशासकीय सदस्यांना प्रवास भत्ता किंवा इतर कोणतेही भत्ते देय राहणार नाहीत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( वाय. टी. पाडवी )

कार्यासन अधिकारी,गृह विभाग, महाराष्ट्र शासन

----------

प्रति,

आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
सर्व पोलीस आयुक्त,
सर्व विभागीय उपआयुक्त, राज्य उत्पादन शुल्क,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व पोलीस अधीक्षक,
सर्व अधीक्षक, राज्य उत्पादन शुल्क,
सर्व तहसिलदार,
मा. मुख्यमंत्री यांचे सचिवालय, मंत्रालय, मुंबई-३२.
सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
कार्यासन वि.शा.५, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.३२.
निवडनस्ती.